**आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत “महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्पाकरीता” सन २०२१-२२ मध्ये रू. २.७३ कोटी (कर्जे व आगाऊ रकमा क्र. ६७११ ००१५) निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०२२२/प्र.क्र.१६/बंदरे-२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक :- २४ मार्च, २०२२**

संदर्भ:- १. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र जा क्र.ममेबो/एडीबी-पीएमयू/११/२०२२ दि. १०/०२/२०२२

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. १४.१०.२०२१

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. ०३.०२.२०२२

**प्रस्तावना:-**

आशियाई विकास बँक पुरस्कृत “महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प (MSCRCPMIP)” हा नवीन प्रकल्प कर्ज प्रस्तावांतर्गत (Stand-alone loan) करारनामा स्वाक्षांकित झाल्यापासून ५ वर्षे इतक्या कालावधीत राबविण्यासाठी दि. २६ मार्च २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

या प्रकल्पाच्या एकूण रू.६४३.५ कोटी इतक्या अंदाजीत खर्चास मान्यता देण्यात आली आहे. यापैकी रू. ४०५.४ कोटी ADB चे कर्ज, रू.१७३.७४ कोटी राज्य शासन व रू.६४.३५ कोटी खाजगी क्षेत्राचा अथवा महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचा वाटा राहील. तसेच खाजगी क्षेत्राकडून प्रतिसाद न मिळाल्यास खाजगी क्षेत्राच्या सहभागापोटी प्राप्त होणारा हिस्सा महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या स्वनिधीतून उपलब्ध करून देण्यात येईल.

नवीन कर्ज प्रस्तावांतर्गत ADB पुरस्कृत महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी आशियाई विकास बँकेकडून होणाऱ्या प्रकल्प व्यवस्थापन चमूच्या (PMU) क्षमता मुल्यांकन बाबतच्या शिफारशीनुसार विशिष्ट तांत्रिक अर्हता असलेली पदे प्रतिनियुक्तीने तसेच कंत्राटी पध्दतीने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास असलेल्या अधिकारान्वये भरण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर पदांचे वेतन-भत्ते, वाहनखर्च व कार्यालयीन खर्च इत्यादी करीता आवश्यक असलेला निधी या प्रकल्पाच्या राज्य हिश्श्यामधून उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प" (कर्जे व आगाऊ रकमा क्र. ६७११ ००१५) करीता सन २०२१-२२ मध्ये रू. ४.५५ कोटी इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर मंजुर निधीपैकी ६० टक्केच्या मर्यादेत रू. २.७३ कोटी इतका निधी खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No. | Particulars | Total Amount |
|---|---|---|
| 1. | Project Consultant Remuneration (Project Management and Design Consultant) and Project Preparatory Activities | २.७३ कोटी |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहीत कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १४.१०.२०२१ व दि.०३.०२.२०२२ च्या शासन निर्णय व परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२२ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-१२, लेखाशीर्ष क्र. ६७११-००, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांसाठी कर्जे (००), (००) (०१) आशियाई विकास बँक अर्थ सहाय्यीत शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन गुंतवणूक कार्यक्रम (कार्यक्रम) ५५, कर्जे व आगाऊ रकमा (६७११ ००१५)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९/१४६१/ दि. १६.०२.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ८६/२०२२/व्यय-८, दि.०३.०३.२०२२ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०३२४१५४६२६९१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2022.03.24 15:47:43 +05'30'

**( निलीमा कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.

२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती (बंदरे-२).